**जिल्हा वार्षिक योजना २०१४-१५ साठी एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रमाखाली अहमदनगर जिल्हयातील सहकारी दूध संघाच्या प्रस्तावांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१४/प्र.क्र.३८/पदुम ८**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २३ जानेवारी, २०१५

वाचा -
**१) शासन निर्णय क्र. एमएलके २०११/प्र.क्र.२२२/पदुम ८, दि.८.१२.२०११**
**२) शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०११/प्र.क्र.२२२/पदुम ८, दि.२२.१०.२०१३**
**३) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र. आदुवि ६/जिवायो/भाग ०५/२०१४-१५/०७, दि.१६.१.२०१५**
**४) शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१४/प्र.क्र.३८/पदुम ८, दि.१३.१.२०१५**
**५) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र. आदुवि ६/जिवायो/भाग ०५/२०१४-१५/०७, दि.१६.१.२०१५**

**प्रस्तावना :**

जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत अहमदनगर जिल्हयातील ४ सहकारी दूध संघांच्या रु.३५४.९० लक्ष रक्कमेच्या प्रस्तावास शासनाने संदर्भ क्रमांक २ अन्वये प्रशासकीय मंजूरी दिलेली होती. तद्नंतर संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी केलेल्या विनंतीनुसार शासनाने संदर्भ क्र.४ अन्वये शासन निर्णय निर्गमित केला. आता संदर्भ क्र ५ अन्वये आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयानुसार गोदावरी खोरे नामदेवरावजी परजणे पाटील तालुका सहकारी दूध उत्पादक संघ, कोपरगाव या संघाचा प्रस्ताव पूर्णत: रद्द न करता संघाच्या प्रस्तावातील बल्क मिल्क कुलर्स हा घटक वगळून संगणक सचिव हा घटक मंजूर करावा, अशी विनंती केली आहे. तसेच यापूर्वी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील काही त्रुटी दुरुस्त करण्याची आवश्यकता लक्षात घेता याप्रकरणी सुधारीत आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयाद्वारे जिल्हा वार्षिक योजना २०१४-१५ साठी अहमदनगर जिल्हयातील ४ सहकारी दूध संघाच्या रु.३१३.६० लक्ष रक्कमेच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मंजूरी देत आहे. सदर मंजूरी खालील नमूद तपशीलप्रमाणे असेल.

(रु.लक्ष)

| अ.क्र. | संघाचे नाव | शासन हिस्सा | संघ हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | गोदावरी खोरे नामदेवरावजी परजणे पाटील ता. सहकारी दूध उत्पादक संघ मर्या.,कोपरगाव, जि.अहमदनगर | ५.७७५ | १.९२५ | ७.७० |
| २ | संगमनेर तालुका सहकारी दूध उत्पादक व प्रक्रिया संघ मर्या., संगमनेर, जि.अहमदनगर | २६.६२५ | २२.८७५ | ४९.५० |
| ३ | नेवासा तालुका सहकारी दूध व्यवसायिक संघ मर्या., नेवासा, जि.अहमदनगर | १६.०५० | ५.३५० | २१.४० |
| ४ | अमृतसागर तालुका सहकारी दूध व्यवसायिक व प्रक्रिया संघ मर्या., अकोले, जि.अहमदनगर | १५२.५०० | ८२.५०० | २३५.०० |
| | **एकूण** | **२००.९५०** | **११२.६५०** | **३१३.६०** |

**अटी व शर्ती –**

१) सदर प्रकल्पांतर्गत मंजूर करण्यात आलेले घटक हे दिनांक ८.१२.२०११ च्या शासन निर्णयाप्रमाणे असणे बंधनकारक राहील. तसेच सदर शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील

२) शासनाने प्रस्तुत संघाना इतर योजनेतून त्यांच्या सभासद संस्थांना मंजूर केलेल्या बल्क मिल्क कुलर्स, सचिव संगणक उपलब्ध करुन दिलेले आहेत ते वगळता इतर सभासद दूध संस्थाच्या ठिकाणी सदर मंजूर उपकरणे वितरीत करावी.

३) प्रस्तुत संघाच्या सभासद सहकारी संस्थाकडे दिनांक ८.१२.२०११ च्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे दूध संकलन आवश्यक आहे. त्याबाबतचा स्वतंत्र अहवाल प्रादेशिक दुग्धव्यवसाय अधिकाऱ्यांनी आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास व शासनास सादर करावा.

४) संघाच्या दूध संकलन मार्गावर बल्क मिल्क कुलर्स बसविण्यात येतील याची दक्षता संबंधित संघ व जिल्हा दुग्धव्यवसाय अधिकारी यांनी घ्यावी.

५) वरील तक्त्यात मंजूर केल्याप्रमाणे दूध संघाने आपली स्व:गुंतवणूक केली आहे याची खात्री संबंधित जिल्हा दुग्धव्यवसाय अधिकारी यांनी करावी.

६) उपकरणांची खरेदी करण्यासाठी आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या पध्दतीनुसार निविदा प्रक्रियेचा अवलंब करावा.

७) सदर योजना कार्यान्वित करण्याची संपूर्ण जबाबदारी जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांची राहील व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी हे संबंधित योजनेसाठी संनियंत्रण अधिकारी राहतील.

सदरहू प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या योजनेवरील खर्च हा जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत "एकात्मिक दुग्धव्यवसाय कार्यक्रम" हया खाली मंजूर होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२३१६४२३४७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2015.01.23 16:53:12 +05'30'

**(श.मा.साठे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई ४०००१८
२. विभागीय आयुक्त, नाशिक
३. जिल्हाधिकारी, अहमदनगर
४. सहायक आयुक्त (लेखा) आयुक्त्, दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी, मुंबई
५. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, नाशिक विभाग, नाशिक
६. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, जि.अहमदनगर
७. महालेखापाल १ /२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा नियोजन अधिकारी, अहमदनगर
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती